राज्यातील महसूल विभागातील तलाठी संवर्गातील (गट-क) सरळसेवेची सर्व रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः भरती-२०१५/प्र.क्र.४७३/ई-७**

मंत्रालय (मुख्य इमारत), १ ला मजला,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ०३ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक २.०६.२०१५

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.२९०/का-१२, दिनांक १६.०७.२०१५

३) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३६४/का-१२, दिनांक ०१.०९.२०१५.

**प्रस्तावना :**

शासकीय विभाग/कार्यालयातील गट-अ ते ड मधील पदे विहित टक्केवारीपेक्षा जास्त प्रमाणात भरण्यावर संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ०२.०६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्बंध घालण्यात आले आहेत. महसूल विभागासाठी महसूल वसुलीचे उद्दिष्ठ पूर्ण करण्यासाठी व महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम,२०१५ अंतर्गत महसूल विभागामार्फत निश्चित करण्यात आलेल्या सेवा जनतेस वेळेत उपलब्ध करुन देण्यासाठी तसेच राष्ट्रीय भूमी अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्यातील तलाठी संवर्गातील सर्व रिक्त पदे तातडीने भरण्याची आवश्यकता आहे. मात्र संदर्भ क्रमांक १ वरील दिनांक ०२.०६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील निर्बंधामुळे प्रशासकीय कामकाज सुरळीत चालविण्यासाठी आवश्यक संख्येत तलाठी संवर्गीय कर्मचाऱ्यांची पदे भरणे सद्यस्थितीत शक्य नाही.

२. शासकीय विभाग/कार्यालयातील गट-अ ते गट-ड मधील ज्या संवर्गात रिक्त पदे विहित टक्केवारी पेक्षा जास्त प्रमाणात भरण्याची तातडीची गरज आहे, असे प्रस्ताव तपासणीसाठी अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली समितीसमोर सादर करण्याची तरतूद संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक १६.०७.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर तरतूदीनुसार महसूल विभागातील तलाठी संवर्गातील सर्व रिक्त पदे भरण्याची तातडीची गरज लक्षात घेवून मान्यता देण्याचा प्रस्ताव दिनांक २९.०८.२०१५ रोजी अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत

सादर करण्यात आला होता. सदर बैठकीत ठाणे-पालघर जिल्ह्यातील ४६ व राज्याच्या उर्वरित जिल्ह्यातील १११९ याप्रमाणे सर्व ११६५ रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्यात आली. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील तलाठी संवर्गातील सरळसेवा कोट्यातील ठाणे-पालघर जिल्ह्यातील ४६ व राज्याच्या उर्वरित जिल्ह्यातील १११९ याप्रमाणे सर्व ११६५ रिक्त पदे भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त निर्णयानुसार आवश्यक कार्यवाही करुन प्रत्यक्षात किती पदे भरण्यात आली याचा तपशिल दिनांक १०.११.२०१५ पुर्वी शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१७०८३६७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3c0e93ab894790967228875f0b4fd8c2fda8590b77ae2ea700bf19e91a673afc, cn=Madhav Vitthal Veer
Date: 2015.10.06 17:08:45 +05'30'

**( डॉ. माधव वीर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हाधिकारी,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर,
४. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. वित्त विभाग (अर्थ-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. सर्व कार्यासन (ई), महसूल व वन विभाग, मंत्रालय-४०० ०३२.
७. निवडनस्ती, ई-७/ई-१० कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.